माहे जुलै,२०२१ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे दरड कोसळल्याने बाधित मौजे तळीये, कोंडाळकरवाडी व बौध्दवाडी, ता. महाड, जि. रायगड, मौजे केवनाळे, ता. महाड, जि. रायगड व मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड या गावांच्या कायमस्वरुपी पुनर्वसनाकरीता निधी मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्रमांक : पुनर्व २०२१/प्र.क्र.३४/भाग-२/आव्यप्र-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०८ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :**

दिनांक २२ व २३ जुलै, २०२१ रोजी मौजे तळीये, कोंडाळकरवाडी व बौध्दवाडी ,ता. महाड, जि. रायगड, मौजे केवनाळे, ता. महाड, जि. रायगड व मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड येथे अतिवृष्टीमुळे दरड कोसळून मोठ्या प्रमाणात जिवित हानी झालेली आहे. सदर गावांतील दरड कोसळून बाधित झालेल्या नागरीकांचे कायमस्वरुपी पुनर्वसन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दिनांक २२ व २३ जुलै, २०२१ रोजी झालेल्या अतिवृष्टीमुळे दरड कोसळल्याने बाधित मौजे तळीये, कोंडाळकरवाडी व बौध्दवाडी ,ता. महाड, जि. रायगड, मौजे केवनाळे, ता. महाड, जि. रायगड व मौजे साखर(सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड या गावांच्या कायमस्वरुपी पुनर्वसनाच्या प्रस्तावास शासनाने मान्यता दिली असल्याने जिल्हाधिकारी, रायगड यांनी प्रस्तावित केल्यानुसार भुसंपादन तसेच नागरी व सार्वजनिक सोई सुविधा, विद्युत पुरवठा तसेच जल जीवन मिशन अंतर्गत पाणी पुरवठा करणे या कामांकरीता एकूण रु. १३.२५ कोटी इतका निधी या शासन निर्णयाद्वारे खालीलप्रमाणे मंजूर करण्यात येत आहे.

**तक्ता अ**

(एकूण रुपये)

| अ.क्र. | कामाचे नाव | मंजूर निधी |
|---|---|---|
| **मौजे तळीये, कोंडाळकरवाडी व बौध्दवाडी ,ता. महाड, जि. रायगड** | | |
| १ | भुसंपादनाकामी | २,९२,१७,७६१/- |
| **मौजे केवनाळे, ता. महाड, जि. रायगड** | | |
| १ | भुसंपादनाकामी | ६४,२६,१४८/- |
| **मौजे साखर (सुतारवाडी), ता. पोलादपूर, जि. रायगड** | | |
| १ | भुसंपादनाकामी | ३८,४१,७८६/- |
| | **एकूण (अ)** | **३,९४,८५,६९५/-** |

**तक्ता ब**

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **मंजूर निधी** |
|---|---|---|
| **मौजे तळीये, कोंडाळकरवाडी व बौध्दवाडी ,ता. महाड, जि. रायगड** | | |
| १ | नागरी व सार्वजनिक सोयी सुविधाकामी | ७,८९,७४,६०७/- |
| २ | विद्युत पुरवठ्याकामी | ४३,००,३८१/- |
| ३ | जल जीवन मिशन अंतर्गत पाणी पुरवठा करणेकामी | ९७,४१,५६४/- |
| | **एकूण (ब)** | **९,३०,१६,५५२/-** |

**२.** वरील सर्व कामांसाठी जिल्हाधिकारी, रायगड यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३.** उपरोक्त प्रकल्प हा तातडीने राबवावयाचा आहे. वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे **तक्ता 'अ'** बाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर,चक्रीवादळे इ. १०१-अनुग्रह सहाय्य (९३) इतर (०३) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरीता रस्ते व घरे इत्यादी बांधकामासाठी संपादन केलेल्या/अधिग्रहित केलेल्या जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) ( २२४५ ०१८२)" तसेच **तक्ता -ब** ॰ बाबत होणारा खर्च "मागणी क्रमांक सी-६, मुख्य लेखाशिर्ष २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर,चक्रीवादळे इ. १०१-अनुग्रह सहाय्य (९३) इतर (०५) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरीता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा इ. नागरी सुविधांवरील खर्च (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) ( २२४५ ०९८८)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**४.** हा निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची जिल्हाधिकारी, रायगड यांनी खातरजमा करावी. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे त्याबाबतची माहिती जिल्हाधिकारी, रायगड यांनी या विभागाकडे मासिक खर्चाचा अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/ नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्यावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत जिल्हाधिकारी, रायगड यांनी एकत्रितपणे महसुल व वन विभागास ( कार्यासन म-११ ) न चुकता सादर करावे. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

**५.** नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव ( मदत व पुनर्वसन ) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलांसोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. तसेच कोषागारातून / उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ५०९/२०२१/व्यय-९ दिनांक २९.१२.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०८१७५९५७१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, pseudonym=E14A6C7BDC7544D127BE94A39CB259A8518EA959, serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2022.02.08 18:02:19 +05'30'

**( संदीप ना. कांबळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती निवारण प्राधिकरण रायगड.
३. उप विभागीय अधिकारी, महाड/ पोलादपूर, जिल्हा रायगड.
४. कोषागार अधिकारी, रायगड.
५. महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)
६. अवर सचिव/कार्यासन अधिकारी, (ब-१/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, आव्यप्र-२.